आपले सरकार सेवा केंद्र प्रकल्पांतर्गत माहे एप्रिल,मे, जून २०१७ या कालावधीतील पेमेंट बाबत....

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

### शासन परिपत्रक क्रमांकः आसक-२०१७/प्र.क्र.३२/आपले सरकार कक्ष

बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: १३ डिसेंबर, २०१८.

<u>वाचा :-</u>

**१) शासन परिपत्रक क्रमांकः- आसक-२०१७/प्र.क्र.३२/आपले सरकार कक्ष, दि.०६ सप्टेंबर, २०१७ व दि.३१ ऑक्टोबर, २०१७ .**

**-: शासन परिपत्रक :-**

"आपले सरकार सेवा केंद्र (ASSK)" प्रकल्पांतर्गत शासन निर्णय दि. ६सप्टेंबर, २०१७ अन्वये देयक संगणक प्रणालीद्वारे सीएससी-एसपीव्हीस देयके अदा करण्याची कार्यपद्धती निश्चित करण्यात आलेली आहे. सदर कार्यपद्धतीनुसार केंद्र चालकाने सादर केलेल्या देयकाची तपासणी करुन ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी यांच्या स्तरावर सीएससी-एसपीव्ही यांना देयकाची रक्कम अदा करण्यात येत होती. मात्र या कालावधीतील काही ग्रामपंचायतींनी अद्याप कंपनीला रक्कम अदा केली नसल्याचे कळविले आहे. तसेच काही ग्रामपंचायतींनी रक्कम अदा केली परंतू UTR अपलोड केले नाहीत किंवा UTR चा ताळमेळ लागत नाही या कारणामुळे सदर रक्कम कोणत्या ग्रामपंचायतीची आहे याचा कंपनीस बोध होत नाही. परिणामी या कालावधीत काही केंद्र चालकांना त्यांचा मोबदला मिळालेला नाही.

या संदर्भात पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१. सीएससी-एसपीव्ही यांनी ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी यांच्या लॉगीनमध्ये एक Popup Winodw देण्यात यावी. त्यामध्ये ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी सीएससी-एसपीव्ही यांना अदा केलेली रक्कम व UTR नंबर टाकावा.
२. सीएससी-एसपीव्ही यांनी सदर UTR व रक्कम तपासून त्यांचेकडे प्राप्त माहिती सोबत ताळमेळ घ्यावा.

३. ज्या ग्रामपंचायतींनी माहे एप्रिल,मे,जून या कालावधीतील देयके सीएससी-एसपीव्हीला अदा केलेली नाहीत त्यांनी सदर परिपत्रकाच्या दिनांकापासून ७ कार्यालयीन दिवसांत सीएससी-एसपीव्ही यांना रक्कम अदा करावी. या कालावधीत देखील रक्कम अदा करण्यात आली नाही तर सदर प्रकरणी शासन परिपत्रक दि. ३१ ऑक्टोबर, २०१७ अन्वये निश्चित केलेली जुलै, २०१७ ची देयक संगणक प्रणाली लागू करण्यात येईल. व सदर रक्कम संबंधित ग्रामपंचायतींने जिल्हा परिषदेच्या खात्यात जमा केलेल्या अग्रीम रक्कमेतून वळती करण्यात येईल. तसे झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित ग्रामसेवक/ग्राम विकास अधिकारी यांची राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१३१४४७१८४९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aseem Surendrakumar Gupta

Digitally signed by Aseem Surendrakumar Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Developement Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Surendrakumar Gupta
Date: 2018.12.13 16:47:09 +05'30'

**(असीम गुप्ता)**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२. सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (पंचायत/सा.प्र.वि).
३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
४. सर्व पंचायत समितींचे गट विकास अधिकारी.
५. सर्व ग्रामपंचायतींचे ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी.
६. सीएससी-एसपीव्ही ई-गव्हर्नन्स इंडिया लिमिटेड, इलेक्ट्रॉनिक निकेतन, तिसरा मजला, DeITY, ६ सीजीओकॉम्प्लेक्स, लोधी रोड, नवी दिल्ली-११०००३.
७. निवड नस्ती, आपले सरकार कक्ष, ग्रामविकास व पंचायत राज विभाग.

प्रत माहितीसाठी

१. सचिव, ग्रामविकास विभाग
२. उप सचिव, ग्रामविकास विभाग